GR-200407281226200001-1100

**महाराष्ट्राचे जैव तंत्रज्ञान धोरण, २००१**

**महाराष्ट्र शासन**
शासन निर्णय क्र.बीटीएच-२००१/(५०५८)/उद्योग-२
उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २९ जानेवारी, २००२

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र हे प्रतिभावान राज्य असून राष्ट्रीय स्तरावर आर्थिक व सामाजिक नवजीवन क्षेत्रात नेहमीच अग्रेसर असून विज्ञान व तंत्रज्ञान क्षेत्रातील प्रगतीकडे राज्याने आर्थिक विकासाच्या व सामाजिक बदल घडवून आणण्याच्या संधी म्हणूनच पाहीले आहे. "ज्ञानाचे शतक" म्हणून गणण्यात आलेल्या नवीन शतकात ज्ञानावर आधारीत उद्योगांसाठी मोठ्या संधी आहेत.

२. जैव तंत्रज्ञानाचा संबंध वनस्पती, प्राणी आणि सूक्ष्मजीव यासह सजीव प्रणालींशी येतो. जीवनास आधार देणाऱ्या जैविक प्रक्रीयांपासून जैव तंत्रज्ञानास बळ प्राप्त होते. सजीव सेंद्रीय किंवा त्यांचा भाग आणि इन्झाइम्स, प्रोटीन्स जी नैसर्गिकरित्या उपलब्ध आहेत अथवा सजीव प्रणालीतून काढून त्याचा वापर होतो अशा कोणत्याही पध्दतीचा अंतर्भाव या तंत्रज्ञानात होतो. अशा पध्दतीचा उपयोग हा उत्पादनासाठी किंवा उत्पादनात बदल करण्यासाठी, वनस्पती किंवा प्राणी यांची उत्पादन क्षमता विकसित करण्यासाठी तसेच विशेष प्रयोजनासाठी सूक्ष्म सेंद्रीय विकसित करण्यासाठी होतो. उदयास येणाऱ्या जैव तंत्रज्ञानात एकत्रित डी.एन.ए., सेलफ्युजन व एम्ब्रिया मॅनिप्युलेशन यांचा वापर होतो. कृषि, पशुसंवर्धन, आरोग्य, पर्यावरण संरक्षण वगैरेद्वारे जनतेचे जीवनमान परिणामकारकरीत्या बदलण्याची क्षमता जैव तंत्रज्ञानात आहे. जैव तंत्रज्ञानातील काही क्षेत्रात केवळ भारतातच नव्हे जागतिक स्तरावर आघाडी घेण्याची क्षमता महाराष्ट्रात आहे. या पार्श्वभूमीवर जैव तंत्रज्ञान धोरण निश्चित करण्याची बाब राज्य शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

३. राज्य शासनाने महाराष्ट्राचे जैव तंत्रज्ञान धोरण, २००१ जाहीर केले आहे. या धोरणाच्या अनुषंगाने, शासन पुढील प्रमाणे आदेश देत आहे:-

**उद्दिष्टे :**

राज्यात जैव तंत्रज्ञान उद्योगाचा विकास होण्यासाठी पुढील उद्दिष्टे राहतील:-

- राज्यातील शेतकऱ्यांना प्रचलित हवामानात सुयोग्य, अधिक उत्पादन देणारी तसेच अवर्षण व किड प्रतिबंधक पिके शेतकऱ्यांना उपलब्ध करुन देणे.
- भारतातील तसेच कटीबंधीय व उप कटीबंधीय भागात सर्वसाधारणपणे माहित असलेल्या रोगांचा मुकाबला करण्यासाठी परवडणाऱ्या व किफायतशीर औषधी व साधने यांचा विकास करणे व रोगांचे प्राबल्य कमी करणे
- नागरी भागातील टाकाऊ पदार्थ तसेच औद्योगिक क्षेत्रामधून सोडण्यात येणारे रासायनिक द्रव्ये यांचो अधिक चांगल्या प्रकारे विल्हेवाट लावणे तसेच जलस्त्रोतांच्या शुध्दीकरणासाठी स्वस्त व प्रभावी तंत्रज्ञान विकसित करणे.

- राज्यातील ग्रामीण भागातील उत्पन्न वाढविण्यासाठी जैविक पध्दतीने पशुधन-विकास करणे.

- जैविक पध्दतीने सागरी संपत्ती सुधारणे व मत्स्यव्यवसायातील उत्पादकता वाढविणे.

- आंतरराष्ट्रीय दर्जाची नवीन उत्पादने विकसित करुन औषधी वनस्पती व पारंपारिक औषध उपचार पध्दतींचे मुल्य व उपयुक्तता वाढविणे.

- पशुसंवर्धन व कुक्कुटपालन यापासून अधिक फायदा होण्यासाठी व नुकसानीस प्रतिबंध करण्यासाठी जनावरांचे रोगनिदान आणि लसींचा विकास व वापर करणे.

- खाद्य व चारा उपलब्धता वाढविणे व प्रक्रीया करणे.

- राज्यात सर्वसाधारण आहार निर्भयता सुधारणे

- चांगले आरोग्य आणि चांगल्या पर्यावरणाच्या माध्यमातून जीवनात गुणात्मक सुधारणा करणे

४. **धोरणात्मक आदेश :-**

४.१ जैव तंत्रज्ञानातील आघाडीचे राज्य होण्याचा उद्देश साकार होण्यासाठी धोरणाची व्यापक अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने महाराष्ट्र जैव तंत्रज्ञान मंडळ आणि महाराष्ट्र जैव तंत्रज्ञान आयोग या दोन शिखर संस्थांची निर्मिती करण्यात यावी.

४.२ राज्याचे मुख्यमंत्री हे महाराष्ट्र जैव तंत्रज्ञान मंडळाचे अध्यक्ष राहतील. सदर मंडळात विज्ञान, तंत्रज्ञान, कृषि, आरोग्य, पशुसंवर्धन, मत्स्यपालन व दुग्धव्यवसाय उद्योग क्षेत्रातील अग्रगण्य व्यक्तींचा व शासकीय अधिकाऱ्यांचा समावेश करण्यात यावा.

४.३ जैव तंत्रज्ञान क्रांतीचा सामाजिक व आर्थिक लाभ राज्यातील प्रत्येक नागरिकास मिळेल या दृष्टीने सदर मंडळ धोरणाची वेळेवर व योग्य अंमलबजावणी होण्याबाबत दक्षता घेईल. भारतात जैवज्ञान प्रगतीच्या आड येणाऱ्या अडचणींचे निराकरणासाठी मंडळाने केंद्र शासनाशी संपर्क ठेवावा.

४.४ राज्य शासनाने सार्वजनिक व खाजगी सहकार्यातून सुरवातीस ५० कोटी रुपये विशेष जैव तंत्रज्ञान विकास निधी उभा करावा. जैव तंत्रज्ञान क्रांतीमुळे लाभ होईल अशा शासनाच्या विविध संबंधित विभागांकडून केलेल्या वार्षिक योजना निधीतून १ टक्का निधी दरवर्षी उपलब्ध करण्यात यावा. सदरचा निधी परदेशातून प्राप्त होणारी अनुदाने व देणग्या यामुळे वाढावा असे प्रयत्न करावेत व तो साहसी प्रयोजनांसाठी वापरण्यात यावा.

४.५ मंडळाला महाराष्ट्र जैव तंत्रज्ञान आयोगाचे पाठबळ राहील व आयोग ही अंमलबजावणी करणारी महत्वाची संस्था राहील. आयोगाचे अध्यक्षपदी नामांकीत वैज्ञानिकांची नियुक्ती करण्यात यावी आणि शिक्षण, उद्योग क्षेत्रासह संबंधित शासकीय अधिकारीही यांची आयोगाचे सदस्य म्हणून नियुक्ती करण्यात यावी.

४.६ आयोगाने जैव तंत्रज्ञान विकास निधीचा सुयोग्य विनियोग करावा. मंडळाचे मुख्य विचारस्त्रोत व प्रमुख सल्लागार म्हणून आयोगातर्फे विविध धोरण विषयक काम पाहण्यात यावे.

४.७ अधिक उत्पादन करणाऱ्या, दुष्काळ व रोग प्रतिकारक, जैविकदृष्ट्या सुधारीत व सध्याच्या हवामानात तग धरु शकणाऱ्या पिकांच्या विविध जाती शेतकऱ्यांना उपलब्ध करुन द्याव्यात. यासाठी जैवतंत्रज्ञान

प्रयोगांमुळे लाभदायक ठरु शकतील अश्या पिकांची निवड करण्यात यावी. तालुका स्तरावरील बीज केंद्रे, कृषि विद्यापिठांचे प्रक्षेत्रे व एम.आय.डि.सी. क्षेत्रातील जमीनी या क्षेत्रिय प्रयोगांसाठी व मान्यताप्राप्त विविध जातींचे बीज गुणन कार्यासाठी जैव तंत्रज्ञान घटकांना उपलब्ध करुन देण्यात याव्यात. जैव विज्ञान व तंत्रज्ञान या उगवत्या क्षेत्रातील स्पर्धात्मक संशोधन व विकासाच्या सर्व बाबींचा अंतर्भाव असणारे जागतिक दर्जाचे 'सेंटर्स ऑफ एक्सलन्स' स्थापण्यासाठी राज्य शासनाने प्रोत्साहन द्यावे. यासाठी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या जमीनी महामंडळातर्फे सवलतीच्या दराने देण्यात याव्यात. त्यासाठी विशिष्ट मापदंड ठरवून अशा केंद्रांची व्याख्या निश्चित करावी. महामंडळाच्या जमिनी व्यतिरीक्त इतरत्र जमीनी उद्योग विभागातर्फे सवलतीच्या दराने, निश्चित अटी/शर्ती ठरवून संबंधित विभागाच्या सल्ल्याने देण्यात याव्यात.

४.८ संशोधन व विकास साखळीचा तार्किक भाग म्हणुन जमिनींचा वापर क्षेत्रिय परिक्षण व प्रयोगांसाठी राज्यात स्थापन होणाऱ्या जैव तंत्रज्ञान कंपन्यांना जमीन धारणा कायद्याच्या मर्यादेपेक्षा जास्त कृषि जमीन संपादन करण्यास अनुमती देण्यात यावी व त्यासाठी संबंधित अधिनियमांमधे आवश्यक तो बदल करण्यात यावा.

४.९ राज्यात विस्तृत सार्वजनिक आरोग्य यंत्रणा असल्याने पारदर्शक व नैतिक पध्दतीने या माहितीचा उपयोग जैव तंत्रज्ञान घटकांना होण्यासाठी त्यांना सहभागी करुन घेण्यात यावे. राज्याच्या सार्वजनिक आरोग्य यंत्रणेने जैव तंत्रज्ञान घटकांबरोबर क्लिनीकल-संशोधनात आंतरराष्ट्रीय स्विकृत मापदंडांनुसार सक्रीय सहभाग घ्यावा.

४.१० अन्न व औषधे प्रशासन यंत्रणेने औषध निर्मिती तसेच अन्न प्रक्रिया, जैव तंत्रज्ञान उद्योगाची वाढ व विकासामध्ये सहाय्यभूत भूमिका पार पाडावी. विविध प्रकारची लस उत्पादन करणाऱ्या सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रमांनी जैव तंत्रज्ञान घटकांसाठी सहकार्य करावे व अशा प्रकारचे नियमन राज्यातील पशुधन व मत्स्य व्यवसायाबाबतही करण्यात यावे.

४.११ विभागीय पर्यावरण समतोल राखण्यासाठी कचरा व्यवस्थापन बाबींशी निगडीत असलेल्या विविध नगरपालिका तसेच सिडको, म्हाडा, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण व एम.आय.डी.सी. सारख्या संस्थांनी जैव तंत्रज्ञान कंपन्यांबरोबर संयुक्त प्रभावी तंत्रज्ञान विकसनाद्वारे टाकाऊ कचऱ्यांचे रुपांतर उपयुक्त उत्पादनात करण्यासंबंधीच्या तसेच, जलशुध्दीकरण व संवर्धन प्रकल्पांत सहभागी व्हावे. सदर उपक्रमांनी त्यांच्याकडील सध्याच्या पायाभूत सुविधा व माहिती जैव तंत्रज्ञान कंपन्यांना प्रयोगांसाठी आणि परिक्षणासाठी उपलब्ध करुन द्याव्यात.

४.१२ माहिती तंत्रज्ञान घटकांना ज्या प्रमाणे दुकाने व आस्थापना अधिनियमांतील तरतुदी अंतर्गत कामाची पाळी, कामाचे तास आणि महिलांना रोजगार या वरील बंधने शिथिल केली आहेत तशी ती जैव तंत्रज्ञान घटकांचे बाबतही शिथिल करण्यात यावीत.

४.१३ उच्च दर्जाची उत्पादने निर्माण करणाऱ्या नवीन व जुन्या जैव तंत्रज्ञान उद्योगांना महाराष्ट्र वीजनियामक मंडळाच्या निवाडयानुसार औद्योगिक वीजदर लागू करण्यात यावेत. याशिवाय कृषी-जैव तंत्रज्ञान उद्योगांना महाराष्ट्र वीजनियामक मंडळाच्या निवाड्यानुसार कृषी क्षेत्रातील ग्राहकांना लागू दराने वीज पुरविण्यात यावी. सर्व जैव तंत्रज्ञान उद्योगांना वैधानिक वीज कपातीपासून सूट देण्यात यावी.

४.१४ जैव तंत्रज्ञान उद्योगांना विद्युतकर भरण्यापासुन सुट देण्यात यावी. या उद्योगांना राज्यात सर्वत्र नीजी वापरासाठी वीज निर्मिती करण्याची परवानगी देण्यात यावी. राज्य सार्वजनिक उपक्रम वा त्यांची

संयुक्त कंपनी यांना राज्यातील जैवतंत्रज्ञान पार्क्ससाठी 'इंडिपेंडंट पॉवर प्रोड्युसर्स' स्थापन करण्यास परवानगी देण्यात यावी.

४.१५ जैव तंत्रज्ञान उत्पादनांवर विक्रीकराचे/ मूल्यवर्धित कराचे दर राष्ट्रीय पातळीच्या शक्ती प्रदत्त समितीच्या शिफारशीनुसार ठरविण्यात यावे.

४.१६ नवीन सामुहिक प्रोत्साहन योजना, २००१ अंतर्गत 'ड'+ आणि विना उद्योग जिल्हा वर्गीकरण असलेल्या क्षेत्रातील जैव तंत्रज्ञान घटकांना त्या क्षेत्रासाठी लागू असणारी प्रोत्साहने देण्यात यावीत व राज्यातील इतर कोणतेही वर्गीकरण असलेल्या क्षेत्रातील जैव तंत्रज्ञान घटकांना 'ड' वर्गीकरण असलेल्या क्षेत्रातील प्रोत्साहने लागू करण्यात यावीत. यात लघु जैव तंत्रज्ञान उद्योगांना भांडवली प्रोत्साहन, ऑक्ट्रॉय परतावा आदिंचा समावेश असावा.

४.१७ सामुहिक प्रोत्साहन योजना, २००१ अंतर्गत क, ड, ड+ आणि विना उद्योग जिल्ह्यातील सर्व घटकांना नवीन जैव तंत्रज्ञान घटकांसह अस्तित्वातील घटकांचे विस्तारीकरण यांना स्टॅंप ड्युटी व नोंदणी फी भरण्यापासून सूट देण्यात यावी. इतर भागांत सार्वजनिक उपक्रमांनी तसेच अशा सार्वजनिक उपक्रमांनी पुरस्कृत केलेल्या संयुक्त क्षेत्रातील कंपन्यांनी विकसित केलेल्या जैव तंत्रज्ञान घटकांनाही हा लाभ देण्यात यावा. खाजगी क्षेत्रातील जैव तंत्रज्ञान पार्कमधे स्टॅंप ड्युटी व नोंदणी फी भरण्यात ५०% सूट देण्यात यावी. जैव तंत्रज्ञान कंपन्यांचे एकत्रीकरण झाल्यास त्यामुळे मालमत्ता व्यवहारावर फक्त १०% स्टॅंप ड्युटी आकारण्यात यावी.

४.१८ महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने वा इतर सार्वजनिक उपक्रमांनी तसेच अशा सार्वजनिक उपक्रमांनी पुरस्कृत केलेल्या संयुक्त क्षेत्रातील कंपन्यांनी विकसीत केलेल्या पार्कमधील जैवतंत्रज्ञान घटकांना अनुज्ञेय चटईक्षेत्राच्या दुप्पट क्षेत्र वापरण्याची परवानगी देण्यात यावी.

४.१९ माहिती तंत्रज्ञान व जैव तंत्रज्ञान उपक्रमांस 'ज्ञान संवर्धक क्षेत्र' असे संबोधित करण्यात यावे अशी सर्व केंद्रे ही माहिती- तंत्रज्ञान घटकांशी समकक्ष म्हणून समजण्यात यावीत आणि माहिती तंत्रज्ञान घटकांना मिळणारी सर्व प्रोत्साहने या केंद्रांनाही देण्यात यावी.

४.२० जैव तंत्रज्ञान पार्क, संशोधन व विकास केंद्रे आणि पथदर्शी-उद्योग-सुविधा यांच्या उभारणीसाठी प्रयत्न करण्यात यावेत व कंत्राटी संशोधनासाठी प्रकल्पात समभागाच्या माध्यमातुन सहभाग घेण्यात यावा. शासनाचा प्रकल्पातील सहभाग समभाग हा जमीनीच्या स्वरुपात राहील.

४.२१ कृषि जैव तंत्रज्ञान क्षेत्रात कार्यरत घटकांना 'कृषि उद्योग' संबोधण्यात यावे व कृषि उद्योगांना लागू असलेली प्रात्साहने, सुट आणि लाभ सदर घटकांना द्यावा. शिवाय, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळातर्फे त्यांच्या कार्य क्षेत्रातील जमीनी या घटकांना औद्योगिक दराने देण्यात याव्यात.

४.२२ महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने जैव तंत्रज्ञान पार्क पुणे (औषधी जैव तंत्रज्ञान), शेंद्रे/जालना व अकोला (कृषि जैव तंत्रज्ञान) येथे स्थापन करावेत. इतर तंत्रज्ञान पार्कना ज्या नेहमीच्या सोयी दिल्या जातात त्याशिवाय, जैव तंत्रज्ञान पार्कला पुढील सोयी देण्यात याव्यात:-

- अमेरिकन अन्न व औषधे प्रशासनाच्या निकषानुसार जी.एम.पी. सोयी
- पार्क मधील व्यवसाय-सुविधा केंद्र (बिझनेस फॅसिलिटेशन सेंटर) तर्फे ग्राहकांना पुढील प्रमाणे सेवा देण्यात याव्यात :-

१) शासकिय संस्थाबरोबर व्यवहार आणि नियामक व कस्टम विषयक मान्यता सत्वर मिळण्यासाठी केंद्र ;

२) उद्योजकांना वीज, दुरध्वनी व इतर जोडणी मिळण्यासाठी सुलभ सेवा ;

३) तंत्रज्ञान हस्तांतर व तंत्रज्ञान पोहोच सेवा ;

४) व्यापारीकरण सेवा ;

५) संशोधन संस्थांबरोबरचे जाळे ;

६) बौध्दिक स्वामित्व संरक्षण व इतर बाबींकरीता समुपदेश, माहिती व सहाय्य;

४.२३ व्यवसाय सुविधा केंद्राने ही जैव तंत्रज्ञान विषयक आधारभूत माहितीचे व्यवस्थापन करावे व बहिष्करण (Quarantine) विषयक बाबी हाताळाव्यात. सुरुवातीस नियामक व्यवहार, जैव तंत्रज्ञान व पणन विषयातील तंज्ञांची सेवा नियोजित करण्यात यावी. या तंत्रज्ञांना सहाय्यभूत पुरेसा कर्मचारीवर्ग देण्यात यावा.

४.२४ जैव तंत्रज्ञान साधन-सामुग्री केंद्र व उत्पादनाच्या प्रमाणिकरणासाठी संदर्भ केंद्राची स्थापना करण्यात यावी. तसेच, नैतिक, कायदेशीर व संरक्षण मानकांसह प्राणीमात्रांवर प्रयोगांची सुविधा निर्माण करण्यात यावी. या प्रयोजनाकरीता जमीनही उपलब्ध करुन देण्यात यावी.

४.२५ जैव तंत्रज्ञान पार्क व साधन-सामुग्री केंद्र हे जैव तंत्रज्ञानाचे मुल्य व फायदे यांचा विस्तृत प्रसार होण्याचे दृष्टीने संशोधन शास्त्रज्ञ, उद्योजक, विस्तार कार्यकर्ते, शेतकरी आणि ग्राहक यांच्यात सहकार्याची नवीन पध्दती निश्चित करण्यात यावी.

४.२६ जैव तंत्रज्ञानास राज्यातर्फे देण्यात येत असलेले महत्व लक्षात घेता राज्यात **जैव तंत्रज्ञान दिवस** ज्यांनी स्वतंत्र भारतात विज्ञान व तंत्रज्ञान प्रगतीची मुहुर्तमेढ रचली त्या जवाहरलाल नेहरु यांचे जन्मदिनी, १४ नोव्हेंबर रोजी राज्यात साजरा करण्यात यावा. अन्न, आरोग्य व पर्यावरणाच्या व्यापक विकासाद्वारे जैव तत्रज्ञान हे एकविसाव्या शतकात 'जीवनाची काळजी घेणाऱ्या साधनांची किल्ली आहे' हा संदेश जनमानसात पोहोचावा असा हा दिवस साजरा करण्यामागील उद्देश आहे. प्रत्येक वर्षाचा तपशिलवार कार्यक्रम जैव तंत्रज्ञान आयोगामार्फत ठरविण्यात यावा.

४.२७ मनुष्यबळ विकास कार्यक्रमांतर्गत बौध्दिक स्वामित्व अधिकाराच्या विविध बाबींचा समावेश होण्यासाठी पदव्युत्तर स्तरावर विशेष अभ्यासक्रम अंतर्भूत करण्यात यावा. विधी शाखेसाठी अभ्यासक्रमात सुधारणा करुन त्यांत पेटंट कायदा व आंतरराष्ट्रीय बौध्दिक स्वामित्व अधिकार विषयक विधी अभ्यासक्रमाचा समावेश करण्यात यावा.

४.२८ महाराष्ट्र जैव तंत्रज्ञान धोरणातील विविध तरतुदी दि.६ डिसेंबर, २००२ पासुन लागू होतील. राज्यातील जैव तंत्रज्ञान घटकांची नोंदणी / रजिस्ट्रेशन सुरवातीस उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मादाम कामा रोड, मुंबई ४०००३२ येथे करण्यात येईल व काही कालावधीनंतर ही सुविधा विभागीय /जिल्हास्तरावर उपलब्ध करण्यात येईल.

४.२९ महाराष्ट्राचे जैव तंत्रज्ञान धोरणाची अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने संबंधित विभागांनी / उपक्रमांनी आवश्यक ते तपशिलवार आदेश निर्गमित करावेत. तसेच, संबंधित अधिनियम व नियम यामधील तरतुदी तपासून त्यात बदल करण्याची कार्यवाही करावी.

H-987(1000-2-02)3

४.३० महाराष्ट्र जैव तंत्रज्ञान धोरणाची अंमलबजावणी करतांना काही अडचणी आल्यास किंवा काही खुलाश्यांची गरज असल्यास महाराष्ट्र जैव तंत्रज्ञान आयोगाचा निर्णय अंतिम राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(व.कृ.वानखेडे)
शासनाचे सह सचिव

प्रति,
मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मुंबई
मा. मुख्यमंत्री
मा. उपमुख्यमंत्री
मा. मंत्री (सर्व)
मा. राज्यमंत्री (सर्व)